**मौ.देवगावफाटा (नांदगाव), ता.सेलु, जि.परभणी नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२०१८/प्र.क्र.२६२/पापु-१८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १७ जानेवारी, २०१९

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१३/प्र.क्र.०६/पापु-१८,दि.११/०२/२०१४ ची मुळ प्रशासकीय मान्यता
२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मजीप्रानावग्रायोमंऔ/तांशा-१/२०१४/१९१४,दि.२७/८/२०१४ अन्वये मुळ तांत्रिक मान्यतेचा आदेश
३) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,परभणी यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता क्र.२५, दि.१०/०९/२०१८
४) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,परभणी यांचे योजना सुधारीत करण्याबाबतचे पत्र क्र. जिपप/ग्रापापुवि/कावि//तांशा-१/२११/२०१८, दि. २७/०९/२०१८

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे.देवगावफाटा (नांदगाव), ता.सेलु, जि.परभणी येथील नळ पाणी पुरवठा योजनेस शासनाच्या संदर्भ क्र.१ येथील निर्णयान्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या रु.९१,५८,९०८/-(ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांनी संदर्भीय क्र.२ अन्वये मूळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.कार्यकारी अभियता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांनी संदर्भ क्र.३ अन्वये सुधारित तांत्रिक मान्यता प्रदान केली. परिणामी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.४ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

मौजे देवगावफाटा (नांदगाव), ता.सेलु, जि.परभणी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १०४.८८./- लक्ष (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी चार लक्ष अठ्याऐंशी हजार फक्त ) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

१) उर्वरीत रकमेस तांत्रिक मान्यता देण्याची कार्यवाही करावी.

२) ही योजना जिल्हा परिषदेमार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

३) या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजूरी दिलेल्या शासन निर्णयातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटीं व शर्तींचे काटेकोरपणे पालन करावे.

४) सन २०१३ मधीव CAG यांच्या अहवालानुसार राज्यातील २१ टक्के पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयक न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसुन येते.त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणी पट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

५) ही योजना पुर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जि.प.परभणी यांचेकडून योजना प्रत्यक्षात पुर्ण झाली आहे. या आशयाची सुचना मिळाल्याच्या दिनांकापासुन १ महीन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पुर्ण झाल्यावर लगेच संबंधीत कार्यकारी कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प. परभणी,संबंधीत ग्रामपंचायत अधिकारी व कंत्राटदार योजनेची संयुक्त पाहणी आयोजित करावी. पाहणीत कोणतेही दोष आढळुन आल्यास योजना ताब्यात देण्यापुर्वी सुधारण्यात यावी.

६) योजना राबविणे, त्यांचे परिरक्षण,दुरुस्त्या विशेष दुरुस्त्या धरुन यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी,योजनेत घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/ अनुदान मिळणार नाही.

७) हागणदारीमुक्तीबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) योजना पुनर्सुधारीत होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९) योजनेची उर्वरीत कामे ६ महीन्यात पुर्ण करण्यात यावीत

२. या योजनेतील सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च रु.१३.३०/- लक्ष (अक्षरी तेरा लक्ष तीस हजार रुपये फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्यातुन/जिल्हा नियोजन मंडळाकडुन / किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतुन करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि.१७/०४/२०१५ च्या क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहीला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११७१७४६४१२४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2019.01.18 13:13:44 +05'30'

**( सु.स.राठोड )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता.
२. मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता.
३. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
४. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
५. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,परभणी
७. महालेखापाल,लेखा परिक्षा,महाराष्ट्र-२,नागपुर
८. महालेखापाल,लेखा परिक्षा,महाराष्ट्र-१,मुंबई
९. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो),बेलापुर,नवी मुंबई.
१०. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,औरंगाबाद.
११. अधीक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,नांदेड
१२. संचालक(वित्त),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन,बेलापुर,नवी मुंबई.
१३. उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,लातुर
१४. वरिष्ठ भुवैज्ञानिक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१५. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, परभणी.
१६. अतिरीक्त मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
१७. अपर मुख्य सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई
१८.प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९.मु.अ.तथा वि.का.अ.,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२०.कार्यासने (पापु-०४,०६,०७,०९,१०,१३,१७ व २०),पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती कार्यासन पापु-१८.